**महाराष्ट्र शासन**

**वित्त विभाग**

**शासन निर्णय क्र. विकवि १२११/प्र.क्र.३५४/वि.प्र.४**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- ३० मार्च, २०१५

वाचा :- १) शासन निर्णय क्र. वाहन-१०००/प्र.क्र.६५/२००१/विनियम, दि.१० सप्टेंबर, २००१.

२) विक्रीकर आयुक्त यांचे पत्र क्र. विउआ/जसं./आस्था-१५/वाहने/ रा.आ.बै./ २०११-१२/ब-९९० मुंबई, दि. ०३ नोव्हेंबर, २०११.

३) विशेष विक्रीकर आयुक्त यांचे पत्र क्र. विउआ (जसं.)/आस्था-१४/ वाहन विभाग/ २०१२-१३/ब-१०५९ मुंबई, दि. ०४ ऑगस्ट, २०१२.

**प्रस्तावना :-**

विक्रीकर विभागामध्ये दि. १ एप्रिल, २००५ पासून मूल्यवर्धित कर प्रणालीची अंमलबजावणी करण्यात आली आहे. तसेच शासन निर्णय क्र. विकवि-१२११/प्र.क्र.२९१/ वि.प्र.-४ दि. १८ नोव्हेंबर, २०११ अन्वये विक्रीकर विभागाच्या पूनर्रचनेचा आढावा घेण्यात आला. त्यामध्ये मनुष्यबळात फेरबदल करण्याचा निर्णय घेण्यात आला असून, अधिकारी वर्गाकरिता आवश्यक असणाऱ्या वाहनांबाबतचा प्रस्ताव विक्रीकर विभागाने शासनास सादर केला आहे. त्यानुषंगाने विक्रीकर विभागाच्या वाहनांच्या आढाव्याचा प्रस्ताव राज्यस्तरीय वाहन आढावा समिती समोर ठेवण्यात आला. सदर प्रस्तावास खालील प्रमाणे मान्यता देण्यात आली आहे.

**शासन निर्णय :-**

विक्रीकर विभागाच्या वाहनांच्या आढाव्याचा प्रस्ताव राज्यस्तरीय वाहन आढावा समिती समोर ठेवण्यात आला असता, सदर समितीने खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

विक्रीकर विभागाकडे कार्यरत असलेल्या १८३ वाहनांना मंजुरी देण्यात येत आहे. याचा तपशिल खालील प्रमाणे आहे.

| अ.क्र. | वाहनांचा तपशिल | वाहनांची संख्या |
|---|---|---|
| १ | विक्रीकर विभागातील वर्जित अधिकाऱ्यांच्या वापरातील वाहने | ७२ |
| २ | विक्रीकर कार्यालयातील पूलसाठी वापरण्यात येणारी वाहने | ३५ |
| ३ | व्यापाऱ्यांच्या भेटीसाठी वापरण्यात येणारी वाहने | ७६ |
| **एकूण** | | **१८३** |

या १८३ वाहनांव्यतीरिक्त अधिकची २५ वाहने विक्रीकर विभागास मंजूर करण्यात येत आहेत. म्हणजेच एकूण २०८ वाहने आढाव्या अंती मंजूर करण्यात येत आहेत.

२. सदर आदेश वित्त विभागाच्या विनियम शाखेच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३१०/विनियम, दि. २५.१०.२०१३ तसेच वित्त विभागाच्या वित्तीय सुधारणा-१ यांच्याकडील अनौपचारीक संदर्भ क्र. ३६९/वि.सु.-१, दि. ०४.१२.२०१३ ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहेत.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३०१६१९१५९६०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shankar Ganpati Satpute

Digitally signed by Shankar Ganpati Satpute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shankar Ganpati Satpute
Date: 2015.04.06 16:43:20 +05'30'

( शं.ग. सातपुते )

सह सचिव, वित्त विभाग

**प्रति :-**

१. विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, माझगांव, मुंबई - ४०० ०१०.
२. विशेष विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, माझगांव, मुंबई- ४०० ०१०.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
४. महालेखापाल (लेखा परिक्षा)-१/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७. सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
८. अपर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
९. सचिव (व्यय) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१०. कार्यासन अधिकारी (विनियम)/(वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय, मुंबई.
११. कार्यासन अधिकारी विक्रीकर प्रशासन- १, २ व ३, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती, विक्रीकर प्रशासन-४, मंत्रालय मुंबई.

*********